**अंगणवाडी सेविका, मिनी अंगणवाडी सेविका, मदतनीस यांचे मानधन जुन्या पध्दतीने आहरित करुन अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१५/प्र.क्र.२७९/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : - १७ मार्च, २०२०

**वाचा :-** (१) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१५/प्र.क्र.२७९/का.६, दिनांक १४ फेब्रुवारी, २०१७

(२) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१५/प्र.क्र.२७९/का.६, दिनांक ७ मार्च, २०१७

(३) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१५/प्र.क्र.२७९/का.६, दिनांक १ जुलै, २०१७

(४) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१५/प्र.क्र.२७९/का.६, दिनांक १७ नोव्हेंबर, २०१७

(५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांचे पत्र क्रमांक एबाविसेयो/का-३/ लेखा/६७५/२०१७-१८, दिनांक १५ फेब्रुवारी, २०१८

(६) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१५/प्र.क्र.२७९/का.६, दिनांक २६ फेब्रुवारी, २०१८

(७) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे पत्र क्रमांक एबाविसेयो/का-३/ लेखा/२१८८/२०१८-१९, दिनांक १२ जून, २०१८

(८) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१५/प्र.क्र.२७९/का.६, दिनांक १३ जून, २०१८

(९) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांचे पत्र क्रमांक एबाविसेयो/का-३/ लेखा/३५२४/ २०१८-१९, दिनांक २६ सप्टेंबर, २०१८

(१०) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१५/प्र.क्र.२७९/का.६, दिनांक १ नोव्हेंबर, २०१८

(११) सचिव (म.व बा.वि.) यांचे अ.शा.प.क्र.एबावि-२०१९/ प्र.क्र.२७९/का.६, दिनांक २६ फ़ेब्रुवारी, २०१९

(१२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांचे पत्र क्रमांक एबाविसेयो/का-३/ लेखा/१२९०/२०१८-१९, दिनांक २५ मार्च, २०१९

(१३) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१५/प्र.क्र.२७९/का.६, दिनांक २७ मार्च, २०१९

(१४) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे पत्र क्रमांक एबाविसेयो/का-३/ लेखा/५१७१/२०१८-१९,दिनांक ५ ऑक्टोबर २०१९

**शासन निर्णय :-**

PFMS प्रणालीव्दारे मानधन सेविकांच्या बँक खात्यात थेट जमा करण्याची कार्यपध्दती प्रायोगिक तत्वावर फेब्रुवारी-२०१७ पासून सुरु करण्याबाबत आयुक्तालयास सूचना देण्यात आल्या होत्या. तथापि, काही तांत्रिक अडचणीमुळे त्यांना PFMS प्रणालीत मानधन अदा करणे शक्य झालेले नसल्यामुळे माहे ३१ मार्च, २०१९ पर्यंत सेविकांचे मानधन जुन्या पध्दतीने कोषागारातुन आहरीत करुन अदा करण्यास शासनाने वेळोवेळी मान्यता दिलेली आहे.

२. राज्यात अंगणवाडी सेविका/मदतनीस/मिनी अंगणवाडी सेविकांची मंजूर पदसंख्या २ लाख ७ हजार इतकी असून १,९५,५३२ कार्यरत सेविकांपैकी काही माहे एप्रिल, २०१९ पासूनच्या मानधन देयकांमध्ये समाविष्ट नसणाऱ्या अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांचे मानधन पूर्वीप्रमाणे प्रकल्पस्तरावरुन जुन्या पध्दतीने अदा करणेबाबतचा प्रस्ताव आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी दिनांक ५/१०/२०१९ चे पत्रान्वये शासनास सादर केला होता. अंगणवाडी सेविका/मदतनीस यांना दरमहा त्यांचे मानधन वेळेत मिळणे आवश्यक आहे, वारंवार सूचना देऊनही अद्याप काही सेविका/मदतनीस यांचे मानधन PFMS प्रणालीत अदा करणे आयुक्तालयास शक्य झालेले नाही. सदर बाब अतिशय गंभीर आहे. ज्या जिल्हा कार्यक्रम अधिकारी(जि.प.), बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण/आदिवासी) प्रकल्प तसेच बाल विकास प्रकल्प (नागरी) यांच्याकडून सदर कामकाज पूर्ण करून घेण्यास हलगर्जी अथवा टाळाटाळ होत आहे. ज्या अंगणवाडी सेविका/मदतनीस /मिनी अंगणवाडी सेविका PFMS प्रणालीत बँक खाते जोडणी करण्यास सहकार्य करीत नसतील तर संबंधित अधिकाऱ्यांबरोबरच अंगणवाडी सेविका/मदतनीस/मिनी अंगणवाडी सेविका यांच्यावर देखील जबाबदारी निश्चित करून त्यांच्याविरुद्ध मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद) तसेच आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी तात्काळ शिस्तभंगाची कारवाई करावी व केलेल्या कार्यवाहीचा अनुपालन अहवाल तात्काळ शासनास सदर करावा, असे सचिव (म.व बा.वि.) यांच्या दिनांक २६/०२/२०१९ च्या अ.शा.पत्रान्वये कळविण्यात आले आहे.

३. परंतु, अद्यापही राज्यातील काही अंगणवाडी सेविका, मदतनीस आणि मिनी अंगणवाडी सेविका यांचे आधार क्रमांक अवैध असलेने, आधार क्रमांक बँक खात्याशी संलग्न नसणे, आधार संलग्न बँक खाते बंद असणे, आधार क्रमांकाचे बँक खात्याशी Seeding सतत बदलणे आदी कारणांमुळे त्यांचे PFMS द्वारे मानधन अदा होऊ शकत नाही. याकरीता ज्या अंगणवाडी सेविका, मदतनीस आणि मिनी अंगणवाडी सेविका यांनी नवीन बँक खाते उघडल्यास त्याची PFMS प्रणालीशी संलग्नता करणे व जुने बँक खात्याची संलग्नता रद्द करणे याबाबतची कार्यवाही एकाचवेळी करण्यात यावी, जेणेकरुन मानधन प्रलंबित राहणार नाही.

४. सन २०१९-२० या आर्थिक वर्षात ज्या अंगणवाडी सेविका/ मदतनीस/मिनी अंगणवाडी सेविका यांचे बँक खाती आधारकार्डाशी संलग्न झालेली नाहीत त्यामुळे त्यांचे सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील मानधन प्रलंबित राहिले आहे अशा अंगणवाडी सेविका/मदतनीस/मिनी अंगणवाडी सेविका यांचे प्रलंबित राहिलेले मानधन अदा करण्याकरीता शेवटची संधी म्हणून **दिनांक ३१ मार्च, २०२०** पर्यंतचे मानधन जुन्या पद्धतीने आहरीत करून अदा करण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१७१२३३५५९१३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Lalsing
Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2020.03.18 15:41:57 +05'30'

**( ला.रा.गुजर )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) सचिव (महिला व बाल विकास विभाग), मंत्रालय, मुंबई
३) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई
५) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
६) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास
७) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी(जिल्हा परिषद)
८) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
९) महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, मुंबई
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११) निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी )
१४) निवड नस्ती (कार्यासन ६)